**पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ लि., पुणे यांच्या आस्थापनेवरील अधिकारी/ कर्मचारी यांना सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन संरचना लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पविआ-१०१९/प्र.क्र.१३५/पदुम-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक: ०२ फेब्रुवारी, २०२२

**वाचा :-** (१) वित्त विभाग शासन निर्णय क्र.शासाउ-२०१९/प्र.क्र.१३/सा.उ. दिनांक ०४ ऑगस्ट, २०२१

(२) पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, लि. पुणे यांचे पत्र क्र.पुअममेंवविम/प्रशा/८३६/२०२१, दिनांक २७ ऑगस्ट,२०२१

**प्रस्तावना :-**

राज्य शासकीय कर्मचाऱ्यांप्रमाणे पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ लि., पुणे यांच्या आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचारी यांना ७ व्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार सुधारीत वेतनश्रेणी लागू करण्याची बाब शासनाचा विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ लि., पुणे यांच्या आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचारी यांना खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मेंढी व शेळी विकास प्रक्षेत्रावरील ३०१ पदांना व महामंडळाच्या मुख्यालयातील व्यापारी योजनेतील १४ पदाना सोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्ट-अ व परिशिष्ट-ब मध्ये नमूद केल्यानुसार ७ व्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार दिनांक १ जुलै, २०२१ पासून सुधारीत वेतन संरचना लागू करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. **अटी व शर्ती :-**

(१) ७ व्या वेतन आयोगासंदर्भात वित्त विभागाकडून निर्गमित करण्यात आलेली दिनांक ३० जानेवारी, २०१९ रोजीची अधिसूचना व दिनांक २० फेब्रुवारी,२०१९ रोजीचे परिपत्रक, तसेच शासनाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात येणाऱ्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तीचा मार्गदर्शक तत्वे म्हणून अवलंब करावा व त्याप्रमाणे दिनांक १ जुलै, २०२१ पासून सुधारीत वेतनश्रेणीची अंमलबजावणी करावी.

(२) सुधारीत वेतनश्रेणीचा लाभ देताना शासनामधील समकक्ष पदांना लागू करण्यात आलेल्या वेतनश्रेणीपेक्षा महामंडळातील अधिकारी/कर्मचारी यांना मिळणारा लाभ जास्त असू नये. सुधारीत वेतनश्रेण्या त्या मर्यादेतच लागू करावयात.

(३) महामंडळाच्या प्रत्येक वर्षाचे वार्षिक लेखे विहित कालमर्यादेत विधानमंडळासमोर सादर करावेत.

(४) महामंडळातील रिक्त पदे/नवीन पदे निर्माण करणे, अशी कार्यवाही शासनाच्या मान्यतेने करणे बंधनकारक राहील.

(५) शासनाकडून जाहीर करण्यात आलेल्या लाभांशाच्या दरानुसार (किमान ५%) पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळाने प्रत्येक आर्थिक वर्षामध्ये प्राप्त झालेल्या नफ्याच्या किमान ५% अथवा त्यापेक्षा अधिक उचित दराने देय असलेला लाभांश शासनास नियमितपणे अदा करणे आवश्यक राहील.

(६) पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळाने केंद्र व राज्यस्तरीय यंत्रणेशी आवश्यक समन्वय करून राबविण्यात येणाऱ्या योजनांबाबत उचित कालबध्द कार्यक्रम तयार करावा व यानुसार महामंडळाने सादर केलेल्या अंदाजित नफ्याच्या आकडेवारीप्रमाणे तो नफा प्रत्यक्षात आणण्याकरीता योग्य त्या उपाययोजना कराव्यात व योजनांची कुशलतेने अंमलबजावणी करावी.

३. महामंडळाच्या मेंढी व शेळी विकास प्रक्षेत्रावरील ३०१ पदांना दिनांक १.७.२०२१ पासून सुधारीत दराने वेतन, तसेच दिनांक १.७.२०२१ पसून पुढे देय असलेल्या वेतनवाढीच्या फरकाची रक्कम याच्यासाठी येणारा खर्च शासनाच्या सहाय्यक अनुदानातून करण्यात यावा. त्याचप्रमाणे महामंडळाच्या मुख्यालयातील व्यापारी योजनेतील १४ पदांना दिनांक १.७.२०२१ पासून सुधारीत दराने वेतन, तसेच दिनांक १.७.२०२१ पसून पुढे देय असलेल्या वेतनवाढीच्या फरकाची रक्कम याच्यासाठी येणारा खर्च महामंडळाच्या व्यापारी कार्यक्रमातून भागविण्यात यावा.

४. सदरचा (व्यापारी योजनेतील पदांव्यतिरिक्त) खर्च खालील लेखाशीर्षामध्ये मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**लेखाशीर्ष**-

मागणी क्र.डी.४
२४०३ पशुसंवर्धन,
१०४ मेष व लोकर विकास
(०१)(०२) पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळाला अर्थसहाय्य
(सांकेतांक - २४०३०६४१)
३६, सहाय्यक अनुदाने (वेतन)

५. सदर आदेश वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.८३/सा.उ.दिनांक २.१२.२०२१ अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२२०२०२१६३८४५९३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, pseudonym=DC507174367F67372038B4A3876B5734B8B7FD46, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2022.02.02 16:40:30 +05'30'

**( विकास तु. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे- ६७.
२. व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ लि. पुणे
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र- १/२, मुंबई / नागपूर.
४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
५. वित्त विभाग/सार्वजनिक उपक्रम, मंत्रालय, मुंबई-३२
६. कृषि व पदुम विभाग/पदुम-१६, मंत्रालय, मुंबई-३२
७. निवड नस्ती (पदुम- ३).

## परिशिष्ट- अ

(शासन निर्णय क्र.पविआ-१०१९/प्र.क्र.१३५/पदुम-३, दिनांक ०२ फेब्रुवारी, २०२२ रोजीचे सहपत्र)

**पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे यांच्या आस्थापनेवरील विविध संवर्गांना सातव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने मंजूर करावयाची सुधारित वेतन संरचना दर्शविणारा तक्ता**

(सहाय्यक अनुदान)

| अ.क्र. | पदनाम | मंजूर | सहाव्या वेतन आयोगानूसार विद्यमान वेतनश्रेणी | ग्रेड वेतन | वित्त विभागाने लागू केलेल्या सातव्या वेतन आयोगानूसार सुधारित वेतन मॅट्रिक्स मधील वेतनस्तर |
|---|---|---|---|---|---|
| १ | व्यवस्थापकीय संचालक | ०१ | प्रतिनियुक्ती | प्रतिनियुक्ती | प्रतिनियुक्ती |
| २ | वित्तीय सल्लागार व प्रमुख लेखा अधिकारी | ०१ | प्रतिनियुक्ती | प्रतिनियुक्ती | प्रतिनियुक्ती |
| ३ | प्रक्षेत्र व्यवस्थापक तथा सहाय्यक संचालक | १२ | रु.१५६००-३९१०० | रु.५७०० | S-२२: ६००००-१९०८०० |
| ४ | कृषी अधिकारी | ०१ | रु.९३००-३४८०० | रु.४४०० | S-१५: ४१८००-१३२३०० |
| ५ | पशुवैद्यकीय अधिकारी | ०१ | रु.९३००-३४८०० | रु.४३०० | S-१४: ३८६००-१२२८०० |
| ६ | सहाय्यक पशुधन विकास अधिकारी | २१ | रु.५२००-२०२०० | रु.२८०० | S-१०: २९२००-९२३०० |
| ७ | तांत्रिक सहाय्यक | ०२ | रु.५२००-२०२०० | रु.२४०० | S-८: २५५००-८११०० |
| ८ | कनिष्ठ लेखापाल | ०१ | रु.५२००-२०२०० | रु.२४०० | S-८: २५५००-८११०० |
| ९ | कनिष्ठ लेखापरिक्षक | ०१ | रु.५२००-२०२०० | रु.२४०० | S-८: २५५००-८११०० |
| १० | वरिष्ठ लिपीक | ०२ | रु.५२००-२०२०० | रु.२४०० | S-८: २५५००-८११०० |
| ११ | कृषी सहाय्यक | ०२ | रु.५२००-२०२०० | रु.२४०० | S-८: २५५००-८११०० |
| १२ | पशुधन पर्यवेक्षक | ०५ | रु.५२००-२०२०० | रु.२४०० | S-८: २५५००-८११०० |
| १३ | भांडारपाल तथा कनिष्ठ लिपीक | ०१ | रु.५२००-२०२०० | रु.२००० | S-७: २१७००-६९१०० |
| १४ | संघटक | ०१ | रु.५२००-२०२०० | रु.२००० | S-७: २१७००-६९१०० |
| १३ | कनिष्ठ लिपीक | ०८ | रु.५२००-२०२०० | रु.१९०० | S-६: १९९००-६३२०० |
| १४ | विनकर सहाय्यक | ०२ | रु.५२००-२०२०० | रु.१९०० | S-६: १९९००-६३२०० |
| १५ | कताई सहाय्यक (वर्ग-४) | ०२ | रु.४४४०-७४०० | रु.१६०० | S-३: १६६००-५२४०० |
| १६ | (वर्ग-४) मजूर (कायम) | १२२ | रु.४४४०-७४०० | रु.१३०० | S-१: १५०००-४७६०० |
| १७ | मजूर (वैयक्तिक पदे) | ११५ | रु.४४४०-७४०० | रु.१३०० | S-१: १५०००-४७६०० |
| | **एकूण वर्ग १ ते वर्ग ४** | **३०१** | | | |

**परिशिष्ट- ब**

**(शासन निर्णय क्र.पविआ-१०१९/प्र.क्र.१३५/पदुम-३, दिनांक ०२ फेब्रुवारी, २०२२ रोजीचे सहपत्र)**

**पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे यांच्या आस्थापनेवरील विविध संवर्गांना सातवा वेतन आयोगाच्या अनुषंगाने मंजुर करावयाची सुधारित वेतन संरचना दर्शविणारा तक्ता**

## महामंडळाच्या मुख्यालयातील पदे (व्यापारी कार्यक्रम)

| अ.क्र. | पदनाम | मंजूर | सहाव्या वेतन आयोगानूसार विद्यमान वेतनश्रेणी | ग्रेड वेतन | वित्त विभागाने लागू केलेल्या सातव्या वेतन आयोगानूसार सुधारित वेतन मॅट्रिक्स मधील वेतनस्तर |
|---|---|---|---|---|---|
| १ | महाव्यवस्थापक | ०१ | रु.१५६००-३९१०० | रु.६६०० | S-२३: ६७७००-२०८७०० |
| २ | प्रशासकीय अधिकारी | ०१ | रु.९३००-३४८०० | रु.४४०० | S-१५: ४१८००-१३२३०० |
| ३ | कनिष्ठ लिपीक | ०६ | रु.५२००-२०२०० | रु.१९०० | S-६: १९९००-६३२०० |
| ४ | वाहनचालक | ०३ | रु.५२००-२०२०० | रु.१९०० | S-६: १९९००-६३२०० |
| ५ | ट्रॅक्टरचालक | ०३ | ५२००-२०२०० | रु.२००० | S-७: २१७००-६९१०० |
| | **एकूण** | **१४** | | | |